उस्मानाबाद जिल्हा माजी मालगुजारी तलाव व स्वर योजना

GR-2004/1001/12/25901/1201

पाझर तलावाच्या विशेष दुरुस्तीसाठी योजनांतर्गत निधी [illegible] खर्च करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय, क्रमांकः लपायो 1094/प्र.क्र.81/जल-2-अ,

मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 28 सप्टेंबर, 1994.

प्रस्तावना :- शासनाच्या विविध योजनांतर्गत उदा. "2702 लघुपाटबंधारे" योजना, रोजगार हमी योजना, पाझर तलावांची कामे पूर्ण करण्यात आलेली आहेत.

पूर्ण करण्यात आलेल्या पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीसाठी शासकीय अनुदानाची सतत मागणी करण्यात येत होती. पाझर तलावांची विशेष दुरुस्ती हे जलसंवर्धनाचे महत्वाचे काम असल्यामुळे मा. मुख्य मंत्री यांनी योजनांतर्गत अनुदानातून खर्चाच्या परवानगीस मान्यता दिलेली आहे.

पाझर तलावांच्या दुरुस्तीचे निकष ठरविण्याबाबत सखोल विचार करुन शासनास शिफारस करण्यासाठी शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: लपायो 1092/प्र.क्र.211/जल-4, दिनांक 2 नोव्हेंबर, 1992 अन्वये मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) श्री. सु. शा. उदगिरकर यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली होती. सदरहू समितीने केलेल्या शिफारशी तत्वत: मान्य करण्याचे शासनाने ठरविले असून, त्या-अंतर्गत सुचविलेल्या पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीसाठी विविध योजनांतर्गत निधीतून खर्च करण्याबाबत खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

पाझर तलाव हे मुळातच स्थानिक स्तर योजनेचा भाग असणे आवश्यक आहे. त्यासाठी विशेष दुरुस्तीसाठी प्रस्तावित असलेले पाझर तलाव जर स्थानिक स्तर यंत्रणेकडे हस्तांतरित झालेले नसले तर ते आहेत त्या स्थितीत प्रचलित पध्दती अनुसार मोजमापे घेऊन नकाशासह प्रथम स्थानिक यंत्रणेकडे हस्तांतरित करण्यात यावेत. व नंतरच विशेष दुरुस्तीसाठी नमूद केलेल्या पध्दतीनुसार स्थानिक स्तर यंत्रणेकडून प्रस्तावित करण्यात यावे.

## शासन निर्णय

नियमित लघु पाटबंधारे (स्थानिकस्तर) योजना व रोजगार हमी योजनेंतर्गत पूर्ण झालेल्या, पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीसाठी, जिल्हा परिषदा व जिल्हाधिकारी यांना अनुक्रमे "2702 लघु पाटबंधारे" व "2505 ग्रामीण रोजगार" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या योजनांतर्गत अनुदानाच्या 10 टक्के (दहा टक्के) मर्यादेपर्यन्त खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन या आदेशाद्वारे मंजुरी देत आहे.

(अ) निकष:- खालील अटी पूर्ण करणारे पाझर तलावच विशेष दुरुस्तीसाठी हाती घेता येतील.

(1) मंजूर संकल्पनानुसार/अंदाजपत्रकानुसार पाझर तलावाचे बांधकाम पूर्ण झालेले असावे, व ते पूर्ण झाल्याचे प्रमाणित असावे.

(2) पाझर तलावाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर एकदा तरी संकल्पित पूर सांडव्यावरुन वाहिला असावा किंवा कंदरभरणी (गॉर्ज फिलींग) झाल्यानंतर 5 वर्षांचा कालावधी लोटला असावा. या दोन्हीपैकी जे आधी घडेल ते ग्राह्य धरावे.

(ब) विशेष दुरुस्तीमध्ये समाविष्ट करावयाच्या बाबी :-

(1) धरण फुटल्यामुळे किंवा त्यास मोठी हानी पोहोचल्यामुळे लागणारी दुरुस्ती.

(2) सांडवा वाहून गेल्यामुळे किंवा त्यास मोठी हानी पोहोचल्यामुळे लागणारी दुरुस्ती.

(3) मोठ्या पुरामुळे सांडव्याचे खालच्या भागातील पुच्छ मार्गात (टेल चॅनेल) खर्च झाल्यामुळे, सुरक्षक बाजूस हानी पोहोचल्यास करावी लागणारी दुरुस्ती.

(4) धरणातून मोठ्या प्रमाणात पाझर झाल्यामुळे करावी लागणारी दुरुस्ती.

(5) पाझर तलावांत पोहोचणारा संभाव्य धोका व अनर्थ टाळण्यासाठी अत्यावश्यक दुरुस्ती, यामध्ये धरणात अकस्मात आलेले नलिकाभवन (पाईपींग) धोकादायक पातळीपर्यन्त खचलेला वा बसलेला भरणावा भरावा. यांचा समावेश होऊ शकेल.

(क) विशेष दुरुस्तीची कार्यपध्दती -

(1) पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीचे सविस्तर प्रकल्प अहवाल सविस्तर अंदाजपत्रकासह आवश्यक असून त्यांत इतर सामान्य माहिती बरोबर विशेष दुरुस्तीची कारणमिमांसा देऊन त्याची आवश्यकता नमूद करावी. विशेष दुरुस्ती केल्यामुळे होणारे संभाव्य फायदे, लाभव्यय प्रमाण यांचाही अंतर्भाव अहवालात असणे आवश्यक आहे. सदर अहवालासोबत विशेष दुरुस्ती दर्शविणारे सर्व आवश्यक नकाशे (Drawings) जोडलेले असावेत. त्यात दुरुस्ती पूर्वीची व प्रस्तावित दुरुस्ती दर्शविणारी स्थिती स्पष्टपणे दर्शविलेली असावी.

(2) पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीच्या सविस्तर प्रकल्प अहवालास व अंदाजपत्रकास प्रशासकीय व तांत्रिक मंजुरी देण्याचे अधिकार खालीलप्रमाणे राहतील :-

(अ) रु.2,00,000 पर्यन्त संबंधित अधीक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ.

(ब) पूर्ण अधिकार मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे.

वरील अधिकार प्राप्त अधिका-यांनी विशेष दुरुस्तीच्या कामास मंजुरी देण्यापूर्वी नियोजित कामास भेट देऊन, प्रस्तावित बाबींचे प्राकलन व नकाशे विचारात घेऊन खातरजमा करावी व नंतरच कामास मंजुरी द्यावी.

(3) पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीच्या जिल्ह्यांतर्गत कामांची निवड व प्राधान्यक्रम संबंधित अधिक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ आणि/किंवा मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे ठरवतील. ठरविलेल्या प्राधान्यक्रमाने कामे कार्यान्वितीसाठी घेण्यात यावीत.

(4) रोजगार हमी योजनेंतर्गत पूर्ण झालेल्या परंतु जिल्हा परिषदेकडे व्यवस्थापनासाठी हस्तांतरण न झालेल्या, शिवाय यापूर्वीच अशा योजना पूर्ण होऊन त्या जिल्हा परिषदेकडे व्यवस्थापनासाठी हस्तांतरित झालेल्या असल्या तरी काही अपवादात्मक परिस्थितीमध्ये विशेष दुरुस्तीची गरज भासल्यास त्या रोजगार हमी योजनेअंतर्गत सुध्दा घेण्यात याव्यात. अशा पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीची कामे मजुरांच्या उपलब्धतेनुसार रोजगार हमी योजनेअंतर्गत हाती घेण्यांत येऊन त्यावर होणारा खर्च "2505-ग्रामीण रोजगार" या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र विशेष दुरुस्तीचे अंदाजपत्रकातील अकुशल व कुशल प्रमाण 60:40 मध्ये असणे आवश्यक राहील. तसेच विशेष दुरुस्तीची वर नमूद केलेली कार्यपध्दती आवश्यक राहील.

(5) पाझर तलावांच्या विशेष दुरुस्तीचे काम पूर्ण झाल्यावर अपवादात्मक परिस्थिती सोडून परत विशेष दुरुस्तीची आवश्यकता नसल्याची शहानिशा करून तसे प्रमाणित करणे आवश्यक राहील.

(6) विशेष दुरुस्तीसाठी होणारा खर्च -

यावर होणारा खर्च "2702 लहान पाटबंधारे-80-सर्वसाधारण-101 स्थानिक संस्थांना सहाय्य-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-स्थानिक क्षेत्र-महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम 1961 च्या कलम 187 अन्वये जिल्हा परिषदांना योजनांतर्गत" व रोजगार हमी योजनांतर्गत घेतलेल्या पाझर तलावांचा "2505-ग्रामीण रोजगार-60-इतर कार्यक्रम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना-(एक) रोजगार हमी योजना-(एक)(ए) रोजगार हमी योजना" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हे आदेश नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. प्र.क्र.948/व्यय-15, दिनांक 27 सप्टेंबर, 1994 अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

गोरक्षा मेघ,
सह सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

1) मुख्य मंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-400 032,
2) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-400 032,
3) अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
4) मुख्य सचिव,
5) अतिरिक्त मुख्य सचिव,
6) शासनाचे सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव,
7) सर्व विभागीय आयुक्त,
8) सर्व जिल्हाधिकारी,
9) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
10) सर्व मुख्य अभियंता, पाटबंधारे विभाग,
11) मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे,
12) मुख्य अभियंता, सहसचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
13) अधिक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ, ठाणे, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर,
14) सर्व कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद,
15) सर्व कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग,
16) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
17) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
18) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
19) उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर,
20) सर्व जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,
21) वित्त विभाग, मंत्रालय,
22) नियोजन विभाग, मंत्रालय, (कार्यासन-1432 व रोहयो-6),
23) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,
24) पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
25) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
26) सर्व अधिकारी व कार्यासने, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
27) निवड नस्ती.